धोकाग्रस्त (अतिसंवेदनशील) वन्यजीव अधिवास क्षेत्र निश्चित करण्यासाठी गठित करण्यात आलेल्या तज्ञ समितीच्या बैठकींना सदस्य म्हणून उपस्थित राहण्यासाठी आदिवासी विकास विभागाच्या प्रतिनिधींचे नामनिर्देशन करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**आदिवासी विकास विभाग,**

**शासन परिपत्रक क्रमांक : सीडब्ल्यूएच-२०१९/अनौ.सं.क्र.२४/प्र.क्र.५३ (भाग-१)/का.१४**

मादाम कामा रोड,हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२

दिनांक : २६ नोव्हेंबर, २०१९

वाचा :- १) अनुसूचित जमाती व इतर पारंपारिक वन निवासी (वनहक्कांची मान्यता) अधिनियम २००६ नियम २००८ व सुधारित नियम २०१२

२)पर्यावरण वन व जलवायु परिवर्तन मंत्रालय, भारत सरकार यांचे क्र.१-२३/२०१४ डब्ल्यूएल दि.०४.०१.२०१८ चे आदेश.

३)जनजातीय कार्य मंत्रालय, भारत सरकार यांचे क्र.२३०११/२३/२०१७-FRA , दि.०६ मार्च, २०१८ चे आदेश.

४) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव ) नागपूर यांचे आदेश क्र. डेस्क-२३(२)/सर्व्हे/डब्ल्युएल/ १३५/२६४८/२०१८-१९, दि. २३/१०/२०१८

५) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव ) नागपूर यांचे आदेश क्र. डेस्क-२३(२)/सर्व्हे/डब्ल्युएल/ १३५/३६००/२०१८-१९, दि. ११/०१/२०१९

६) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव ) नागपूर यांचे आदेश क्र. डेस्क-२३(२)/सर्व्हे/डब्ल्युएल/ १३५/३७८६/२०१८-१९, दि. २४/०१/२०१९

**शासन परिपत्रक:-**

धोकाग्रस्त (अतिसंवेदनशील) वन्यजीव अधिवास क्षेत्र निश्चित करण्यासाठी पर्यावरण, वन व जलवायु परिवर्तन मंत्रालय, भारत सरकार यांनी संदर्भ क्र.२ अन्वये मार्गदर्शक सुचना विहीत केलेल्या आहेत. सदरील मार्गदर्शक सूचनांच्या परिच्छेद ५ नुसार महाराष्ट्र राज्यातील संरक्षित क्षेत्रामध्ये धोकाग्रस्त (अतिसंवेदनशील) वन्यजीव अधिवास क्षेत्र निश्चित करण्यासाठी संदर्भ क्र. ४, संदर्भ क्र. ५ व संदर्भ क्र. ६ अन्वये तज्ञ समितीचे गठन व तज्ञ समितीच्या कार्याबाबत आदेश निर्गमित करण्यात आलेले आहेत. केंद्र शासनाच्या उक्त मार्गदर्शक सूचनेनुसार गठीत करावयाच्या तज्ञ समितीमध्ये आदिवासी विकास विभागाचे प्रतिनिधी म्हणून जनजातीय कार्य मंत्रालय, भारत सरकार यांनी संदर्भ क्र.३ अन्वये प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग यांना प्राधिकृत केलेले आहे. उपरोक्तप्रमाणे क्षेत्रीय स्तरावर धोकाग्रस्त वन्यजीव अधिवास क्षेत्र निश्चित करण्यासाठी आयोजित करावयाच्या प्रत्येक बैठकीसाठी प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग यांना सदस्य या नात्याने उपस्थित राहणे आवश्यक आहे. मात्र, अशा घोषित केलेल्या संरक्षित क्षेत्रामध्ये आयोजित करण्यात येणाऱ्या प्रत्येक बैठकीस प्रधान सचिव, आदिवासी

विकास विभाग यांना उपस्थित राहणे शक्य होत नाही. त्यामुळे उक्त महाराष्ट्र राज्यातील संरक्षित क्षेत्रामध्ये धोकाग्रस्त (अतिसंवेदनशील) वन्यजीव अधिवास क्षेत्र निश्चित करण्यासाठी गठीत केलेल्या तज्ञ समितीमध्ये प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग यांचे प्रतिनिधी म्हणून संरक्षित क्षेत्रातील संबंधित प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. त्यामुळे संदर्भ क्र. ४, संदर्भ क्र. ५ व संदर्भ क्र. ६ अन्वये घोषित केलेल्या संरक्षित क्षेत्रामध्ये आयोजित केल्या जाणाऱ्या तज्ञ समितीच्या बैठकींना सोबतच्या "परिशिष्ट - अ" मधील रकाना क्र. २ येथे नमूद केलेल्या संरक्षित क्षेत्रासाठी रकाना क्र. ३ मधील प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प उपस्थित राहतील व प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग यांचे प्रतिनिधी म्हणून काम करतील.

२. प्रस्तुत धोकाग्रस्त (अतिसंवेदनशील) वन्यजीव अधिवास क्षेत्र निश्चित करण्यासंदर्भात आयोजित करण्यात येणाऱ्या तज्ञ समित्यांच्या बैठकींना उपस्थित राहण्याअगोदर प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प यांनी पुढील प्रमाणे कार्यवाही करावी.

(i) अनुसूचित जमाती व इतर पारंपारिक वन निवासी (वनहक्कांची मान्यता) अधिनियम २००६, नियम २००८ व सुधारित नियम २०१२ मधील कलम ६ मध्ये विनिर्दिष्ट केल्याप्रमाणे, ग्रामसभांकडे /उपविभागीय स्तरीय समितीकडे / जिल्हास्तरीय समितीकडे दाखल केलेल्या वैयक्तिक व सामुहिक वनहक्क दाव्यांवर ( IFR / CFR) अंतिम निर्णय घेण्यात आलेला आहे किंवा कसे, याबाबत खात्री करावी.

(ii) पर्यावरण, वन व जलवायु परिवर्तन मंत्रालय,भारत सरकार यांनी संदर्भ क्र. २ अन्वये दिनांक ४ जानेवारी, २०१८ रोजी विहीत केलेल्या मार्गदर्शक तत्वानुसार कार्यवाही होत आहे किंवा कसे, याबाबतची तपासणी करावी.

(iii) उक्त अधिनियमाच्या कलम ४ (२)(क) ते ४ (२)(च) मध्ये नमूद केलेले टप्पे त्याच क्रमाने पार पाडणे आवश्यक असल्याने प्रस्तुत तरतूदींची अंमलबजावणी होत आहे किंवा कसे याची खात्री करावी.

(iv) अतिसंवेदनशील वन्यजीव अधिवास क्षेत्र घोषित करण्यासाठीचे वैज्ञानिक मापदंड योग्य आहेत किंवा कसे, वन्यजीव व मनुष्य यांचे सहअस्तित्व शक्य आहे किंवा कसे, याची तपासणी करावी.

(v) भूमिसंपादन, पुनर्वसन व पुनर्वसाहत करतांना नुकसान भरपाई मिळण्याच्या आणि पारदर्शकतेचा हक्क अधिनियम २०१३ नुसार विस्थापितांना उचित मोबदला देण्यात येत आहे किंवा कसे, याची तपासणी करावी.

३. उपरोक्त कामांकरिता संबंधित प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प हे त्यांचे स्तरावर तज्ञ व्यक्ती / संस्था तसेच अशासकीय संस्था व क्षेत्रीय यंत्रणा यांची आवश्यकतेनुसार मदत घेऊ शकतील.

४. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०१९११२६१३१००७०८२४ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

PANDURANG MAHADU RAUT

Digitally signed by PANDURANG MAHADU RAUT
DN: CN = PANDURANG MAHADU RAUT, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = TRIBAL DEVELOPMENT DEPT
Date: 2019.11.26 13:14:07 +05'30'

**( पांडुरंग म.राऊत )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
२ अपर मुख्य सचिव ( महसूल ) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
३. प्रधान सचिव ( मदत व पुनर्वसन) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
४. प्रधान सचिव ( वने ) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
५. आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
६. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक
७. सर्व अपर आयुक्त, आदिवासी विकास विभाग
८.सर्व जिल्हाधिकारी
९.सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प
१०. प्रधान मुख्य वन संरक्षक ( वन बल प्रमुख ) महाराष्ट्र राज्य, नागपूर
११. निवड नस्ती.(का.१४) आदिवासी विकास विभाग,मंत्रालय,मुंबई.

शासन परिपत्रक क्रमांक : सीडब्ल्यूएच-२०१९/अनौ.सं.क्र.२४/प्र.क्र.५३ (भाग-१)/का.१४
दि. २६ नोव्हेंबर, २०१९ सोबतचे सहपत्र.

**"परिशिष्ट - अ"**

धोकाग्रस्त (अतिसंवेदनशील) वन्यजीव अधिवास निर्मितीसंबंधी गठीत केलेल्या समितीमध्ये आदिवासी विकास विभागाचे सदस्य असलेल्या प्रतिनिधींची प्रकल्प निहाय यादी.

| अ.क्र. | संरक्षित क्षेत्राचे नांव | एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प कार्यालय नांव |
|---|---|---|
| १ | २ | ३ |
| १ | तानसा वन्यजीव अभयारण्य | प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, शहापूर |
| २ | संजय गांधी राष्ट्रीय उद्यान अभयारण्य | प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, बोरीवली व शहापूर |
| ३ | शिवडी वन्यजीव अभयारण्य | प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, बोरीवली |
| ४ | तुंगारेश्वर वन्यजीव अभयारण्य | प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, डहाणू |
| ५ | भीमाशंकर वन्यजीव अभयारण्य | प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, घोडेगाव |
| ६ | राधानगरी वन्यजीव अभयारण्य | प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, घोडेगाव |
| ७ | सागरेश्वर वन्यजीव अभयारण्य | प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, घोडेगाव |
| ८ | चांदोली राष्ट्रीय उद्यान अभयारण्य | प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, घोडेगाव |
| ९ | कोयना वन्यजीव अभयारण्य | प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, घोडेगाव |
| १० | ताम्हीणी वन्यजीव अभयारण्य | प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, घोडेगाव |
| ११ | माळढोक पक्षी अभयारण्य | प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, सोलापूर |
| १२ | येडशी रामलिंगघाट अभयारण्य | प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, सोलापूर |
| १३ | कर्नाळा पक्षी अभयारण्य | प्रकल्प अधिकारी,एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, पेण |
| १४ | फणसाड वन्यजीव अभयारण्य | प्रकल्प अधिकारी,एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, पेण |
| १५ | सुधागड वन्यजीव अभयारण्य | प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, पेण |

| अ.क्र. | संरक्षित क्षेत्राचे नांव | एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प कार्यालय नांव |
|---|---|---|
| १ | २ | ३ |
| १६ | मालवण मरीन वन्यजीव अभयारण्य | प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, पेण |
| १७ | नांदूरमध्यममेश्वर वन्यजीव अभयारण्य | प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, नाशिक |
| १८ | रेहेकुरी काळवीट वन्यजीव अभयारण्य | प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, राजूर |
| १९ | कळसुबाई हरिशचंद्रगड वन्यजीव अभयारण्य | प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, राजूर |
| २० | नवीन माळढोक पक्षी अभयारण्य | प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, राजूर |
| २१ | यावल वन्यजीव अभयारण्य | प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, यावल |
| २२ | अनेरडॅम वन्यजीव अभयारण्य | प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, धुळे |
| २३ | गुगामल राष्ट्रीय उद्यान अभयारण्य | प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, धारणी |
| २४ | मेळघाट वन्यजीव अभयारण्य | प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, धारणी |
| २५ | टिपेश्वर वन्यजीव अभयारण्य | प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, पांढरकवडा |
| २६ | पैनगंगा वन्यजीव अभयारण्य | प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, किनवट व पुसद |
| २७ | जायकवाडी पक्षी अभयारण्य | प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, औरंगाबाद |
| २८ | गौताळा औट्रमघाट वन्यजीव अभयारण्य | प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, औरंगाबाद |
| २९ | मयुरेश्वर-सुपे वन्यजीव अभयारण्य | प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, औरंगाबाद |
| ३० | बोर वन्यजीव अभयारण्य | प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, वर्धा |
| ३१ | नवीन बोर वन्यजीव अभयारण्य | प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, वर्धा |
| ३२ | विस्तारीत बोर वन्यजीव अभयारण्य | प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, वर्धा |
| ३३ | वान अभयारण्य | प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, अकोला |

| अ.क्र. | संरक्षित क्षेत्राचे नांव | एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प कार्यालय नांव |
|---|---|---|
| १ | २ | ३ |
| ३४ | नरनाळा अभयारण्य | प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, अकोला |
| ३५ | अंबाबरवा अभयारण्य | प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, अकोला |
| ३६ | कारंजा-सोहळ अभयारण्य | प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, अकोला |
| ३७ | लोणार वन्यजीव अभयारण्य | प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, अकोला |
| ३८ | काटेपूर्णा वन्यजीव अभयारण्य | प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, अकोला |
| ३९ | ज्ञानगंगा वन्यजीव अभयारण्य | प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, अकोला |
| ४० | प्राणहिता वन्यजीव अभयारण्य | प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, गडचिरोली |
| ४१ | चपराळा वन्यजीव अभयारण्य | प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, अहेरी |
| ४२ | नवेगांव मोर अभयारण्य | प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, देवरी |
| ४३ | नवेगांव राष्ट्रीय उद्यान अभयारण्य | प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, देवरी |
| ४४ | नवेगांव वन्यजीव अभयारण्य | प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, देवरी |
| ४५ | नागझिरा अभयारण्य | प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, भंडारा |
| ४६ | नवीन नागझिरा वन्यजीव अभयारण्य | प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, भंडारा |
| ४७ | कोका वन्यजीव अभयारण्य | प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, भंडारा |
| ४८ | ताडोबा राष्ट्रीय उद्यान अभयारण्य | प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, चंद्रपूर |
| ४९ | अंधारी वन्यजीव अभयारण्य | प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, चंद्रपूर |
| ५० | भामरागड वन्यजीव अभयारण्य | प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, भामरागड |

| अ.क्र. | संरक्षित क्षेत्राचे नांव | एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प कार्यालय नांव |
|---|---|---|
| १ | २ | ३ |
| ५१ | पेंच राष्ट्रीय उद्यान अभयारण्य | प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, नागपूर |
| ५२ | मानसिंगदेव वन्यजीव अभयारण्य | प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, नागपूर |
| ५३ | उमरेड-पवनी-क-हांडला वन्यजीव अभयारण्य | प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, नागपूर |
| ५४ | ईसापूर वन्यजीव अभयारण्य | प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, गोंदिया |
| ५५ | घोडाझरी वन्यजीव अभयारण्य | प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, गोंदिया |

PANDURANG MAHADU RAUT

Digitally signed by PANDURANG MAHADU RAUT
DN: CN = PANDURANG MAHADU RAUT, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = TRIBAL DEVELOPMENT DEPT
Date: 2019.11.26 13:14:30 +05'30'

**( पांडुरंग म.राऊत )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**